महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाअंतर्गत लघु पाटबंधारे विभाग क्र.१ त्या अंतर्गत सिना खैरी मध्यम प्रकल्प उप विभाग कौतुळ ही दोन कार्यालये अनुक्रमे पंढरपूर व फलटण येथे स्थलांतरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्र.आढावा-२०१०/१९०/(११०/१०)/आ.(प्रशिक्षण),
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १७ जून २०१०.

**प्रस्तावना :-**

नीरा उजवा कालव्याच्या विभागाकडे कार्यभार जास्त असल्याने गुणवत्ता पूर्ण कामे होण्यासाठी सांगोला, शाखा बांधकाम प्रकल्पासाठी एक नविन विभाग उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१ अहमदनगर या विभागाकडे सध्या प्रकल्पीय काम कमी असल्यामुळे सदर विभाग सांगोला शाखा प्रकल्पाच्या कामासाठी पंढरपूर येथे स्थलांतरीत करण्यात येत आहे. तसेच कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१ अहमदनगर यांच्या अंतर्गत कार्यरत असलेल्या चार उपविभागांपैकी सीना - खैरी मध्यम प्रकल्प उपविभाग कौतुळ हा उपविभाग सांगोला शाखा प्रकल्पाच्या कामासाठी फलटण येथे वर्ग करण्यात येत आहे.

२) कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१ अहमदनगर यांच्याकडील उर्वरित खालीलप्रमाणे तीन विभाग सिंचन व्यवस्थापनाची कामे असल्याने मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे यांच्या अधिपत्याखालील कुकडी विभाग क्र.२, श्रीगोंदा या विभागाकडे वर्ग करण्यात येत आहे.

(१) माळ ओहोळ कालवा उपविभाग मिरजगाव

(२) लघु पाटबंधारे उपविभाग क्र.२ अहमदनगर

(३) लघु पाटबंधारे, उप विभाग जामखेड

३) वरीलप्रमाणे वर्ग होणारे विभाग व उपविभागीय कार्यालयातील कर्मचाऱ्यांसह वर्ग करण्यात येत आहे.

४) हा शासन निर्णय, कोणत्याही आवर्ती खर्चात वाढ होणार नाही. या अटीवर व वित्त विभागाच्या क्र.१०९८/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/९२ मधील तरतुदीनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५) ज्या ठिकाणी हेतूबदल होत आहे ती बाब लाक्षणिक पुरक मागणीव्दारे मोप्र-१ कार्यासनाकडून विधी मंडळाच्या निदर्शनास आणण्यात येईल.

६) या प्रकरणी होणारा खर्च मागणी क्र."आय-५, लेखाशिर्ष-४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (८०) सर्वसाधारण क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०४) वेतनावरील खर्चासाठी

भागभांडवली अंशदान (योजनेतर) (०४) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाला भागभांडवली अंशदान (४७०१ आय १६-२)" या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व मंजूर झालेल्या अनुदानातून भागवावा.

७) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra tra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१००६१७१८५०२५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( शुभांगी आगाशे )**
**शासनाच्या अवर सचिव**

प्रत,

मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक
मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१ (लेखा परिक्षा),मुंबई-२०,
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१ (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर ,
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई,
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे
मुख्य अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, कुकडी पाटबंधारे विभाग क्र.१, श्रीगोंदा.
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
सर्व अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
सर्व जिल्हाधिकारी
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
संगणक कार्यक्रम कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (मोप्र-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय यांना माहिती व पुढील आवश्यक त्या कार्यवाहीसाठी प्रत रवाना.
आ.(प्रशि.) कार्यासन संग्रहार्थ.